प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक येथील अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्यातील ३ को.प. बंधारे योजनांच्या दुरुस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
मृद व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०२३/प्र.क्र. ७१९/जल-१
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: १६ मार्च, २०२४

**वाचा:**

१. मृद व जलसंधारण विभाग शासन निर्णय.क्र.कोपब -२०२२/प्रक्र १/जल-१ दिनांक ११.०२.२०२२.
२. मृद व जलसंधारण विभाग शासन निर्णय.क्र. लपायो -२०२२/प्रक्र २/जल-१ दिनांक ११.०२.२०२२.
३. अप्पर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे यांचे पत्र क्र. प्रशा-२/५७७६, दि. ०३.११.२०२३

**प्रस्तावना**

राज्यातील पूर्ण झालेल्या जलसंधारण योजनांपैकी देखभाल व दुरुस्ती आवश्यक असलेल्या योजनांचे परिरक्षण व दुरुस्ती करुन सिंचन क्षमता पुनर्स्थापित आवश्यक आहे. को.प. बंधारा दुरुस्ती मांडवे खुर्द (वाकण वस्ती), को.प. बंधारा दुरुस्ती खडकवाडी (धावड दरा), को.प. बंधारा दुरुस्ती रांजणगाव मशीद (गाढवे वस्ती) ता पारनेर जि. अहमदनगर या ३ योजना जलसंधारण मार्फ़त पुर्ण करण्यात आलेल्या आहेत. प्रस्तावित योजना प्राधान्यक्रम २ मध्ये आहेत. प्रस्तावित ३ योजनांचा मूळ संकल्पित पाणीसाठा ३४० समी व मूळ सिंचन क्षमता.घ. ८२ हेक्टर इतकी आहे. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांचे निरिक्षण टिपणीनुसार धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने योजनांची दुरुस्ती करणे आवश्यक आहे. त्यामुळे सदर दुरुस्तीच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय:**

को.प. बंधारा दुरुस्ती मांडवे खुर्द (वाकण वस्ती), को.प. बंधारा दुरुस्ती खडकवाडी (धावड दरा), को.प. बंधारा दुरुस्ती रांजणगाव मशीद (गाढवे वस्ती) ता पारनेर जि. अहमदनगर या ३ योजनांच्या दुरुस्तीच्या प्रस्तावास एकूण **रु. १,४९,४३,३२९/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणपन्नास लक्ष त्रेचाळीस हजार तीनशे एकोणतीस फक्त)** या किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या अंदाजपत्रकानुसार उपशिर्षनिहाय तरतूद सोबत “जोडपत्र अ” मध्ये सादर करण्यात येत आहे.

१. उपरोक्त पैकी प्रत्येक योजनेस स्वतंत्ररित्या प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. आदेश एकत्रित केलेला आहे.

२. पाणी वापर संस्था स्थापन करण्यासाठी ठेकेदारास निविदेत अटी घालून बंधनकारक करण्यात यावे. WUA स्थापन होईपर्यंत निविदेच्या १०% रक्कम ठेकेदाराच्या देयकातून कपात करण्यात यावी. संस्था स्थापन झाल्यानंतर सदरची रक्कम वितरित करण्यात यावी. अपवादात्मक परीस्थितीत संस्था स्थापित होऊ शकत नसल्यास सविस्तर कारणमीमांसेसह प्रस्ताव शासनास सादर करून शासनाच्या मान्यतेनंतर कपात केलेली १०% निधी वितरित करण्यात यावा.

३. शासन निर्णय दिनांक २०-०७-२०१८ मधील तरतुदीनुसार दुरुस्ती करण्यात यावी.

४. दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकारी यांनी तांत्रिक मान्यता द्यावी.

५. दुरुस्तीच्या कामाचादोष दायित्व कालावधी (Defect Liability Period) हा ५ वर्ष राहील.

६. दुरुस्तीच्या कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण बंधनकारक राहील.

a) काम सुरू करण्यापूर्वी
b) २५% पूर्ण झाल्यानंतर.
c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.
d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.
e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील.

i) काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

ii) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे. किमान दोन वेळेस खुद्द कंत्राटदाराची उपस्थिती आवश्यक आहे.

iii) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उप अभियंता व एका टप्प्यामध्ये कार्यकारी अभियंता यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

iv) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिका सोबत चित्रीकरणाचा PenDrive सादर करावा. तसेच मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

v) सदर चित्रीकरणाची प्रत कार्यकारी अभियंता यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करून होणार नाही.

vi) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या जिओपोर्टलवर Upload करण्यात यावी.

७. कामाची गुणवत्ता उत्तम दर्जाची राहील याची सर्वस्वी जबाबदारी जलसंधारण अधिकारी/ उपविभागीय जलसंधारण अधिकारी/ जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील. गुणनियंत्रण चाचण्या मापदंडानुसार करण्यात याव्यात.

८. क्रॉस चेकिंगसाठी इतर विभागाच्या अखत्यारीतील उपविभागीय जलसंधारण अधिकारी यांनी दुरुस्तीचे काम सुरू असताना तपासणी करावयाची आहे. त्यांची नियुक्ती प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी करावी.

९. काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

१०.ज्या योजनांची अंदाजपत्रकीय किंमत/ दुरुस्तीचा खर्च हा २०% पेक्षा जास्त येत असेल अशा योजनांची दुरुस्तीची अंमलबजावणी शासन निर्णय २०.०७.२०१८ मधील मार्गदर्शक सुचना क्र. ७(१) मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

११.गाळ काढण्याचे काम हे लोकसहभागातून, रोहयोतून किंवा यांत्रिकी विभागामार्फ़त करण्यात यावे.

१२. कामांची व्दिरुक्ती होणार नाही याची दक्षता घेण्याची संपूर्ण जबाबदारी जिल्हा जलसंधारण अधिकारी व उपविभागीय जलसंधारण अधिकारी यांची राहिल.

१३.सदर दुरुस्तीचे प्रस्ताव प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांचे स्तरावर तपासणी केली असल्याने प्रस्तावात अपूर्ण माहिती किंवा चूकीची माहिती दिल्याचे निदर्शनास आल्यास यास सर्वस्वी प्रादेशिक जलसंधारण अधिकारी व त्यांचे अखत्यारीतील संबंधीत क्षेत्रीय अधिकारी जबाबदार राहतील.

१४. केलेल्या कामाचा तपशील ग्रामसभेसमोर ठेवण्यात यावा.

१५. ज्या योजनांची दुरुस्ती केल्यावर सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित होत नाही अशा योजनांच्या दुरुस्तीची कामे हाती घेण्यात येऊ नये.

२.० या ३ योजनांच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षा खाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष मागणी क्र.झेड एच- ५**

**(०२) (०१) लहान पाटबंधारे योजना**

**४७०२ ए ०४६**

**० ते १०० हेक्टर सिंचन क्षमता**

**परिरक्षण व दुरुस्ती (कार्यक्रम)**

**५३, मोठी बांधकामे**

**३.०** सदरहू योजनांच्या दुरुस्तीच्या कामास वरील लेखाशिर्षांतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**४.०** मृद व जलसंधारण विभागाचा शा.नि. क्र. संकिर्ण २०२१/प्र.क्र. २८७(भाग-३)/जल १, दि. २४.०१.२०२४ नुसार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग दोन अन्वये मृद व जलसंधारण विभागास नवीन वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. प्रस्तुत आदेश वरील प्रमाणे प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१६१८०३४८२१२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.16 18:13:39 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३. मा.विरोधीपक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. सर्व मा.संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
८. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९. मा. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक.
१०.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, औरंगाबाद.
१२.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद..
१३.अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
१४.प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
१५.जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, अहमदनगर.
१६. जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर.
१७.कार्यासन अधिकारी (जल-४), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (जल-१).

## मृद व जलसंधारण विभाग

### जोडपत्र 'अ'

### प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक येथील अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्यातील ३ को.प. बंधारे योजनांच्या दुरुस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत योजनेचा गोषवारा.

**शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०२२/प्र.क्र. ७१९/जल-१ दिनांक:- १६ मार्च, २०२४.**

| अ.क्र | शीर्ष/उपशीर्ष कामे | को.प. बंधारा दुरुस्ती मांडवे खुर्द (वाकण वस्ती) ता. पारनेर जि. अहमदनगर | को.प. बंधारा दुरुस्ती खडकवाडी (धावड दरा) ता. पारनेर जि. अहमदनगर | को.प. बंधारा दुरुस्ती रांजणगाव मशीद (गाढवे वस्ती) ता. पारनेर जि. अहमदनगर |
|---|---|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | ० | ० | ० |
| २ | क. कामे | ३९५७९४० | ३९६५९४४ | ३९७६८०० |
| ३ | स्वामित्व शुल्क | १६७१६२ | १७८१९० | १४३१५८ |
| | एकूण | **४१२५१०२** | **४१४४१३४** | **४११९९५८** |
| ५ | विमा | ३९,५७९ | ३९,६५९ | ३९,७६८ |
| ६ | वस्तू व सेवा कर | ७१२,४२९ | ७१३,८७० | ७१५,८२४ |
| | एकूण | **४८७७११०** | **४८९७६६३** | **४८७५५५०** |
| | अनुषंगिक खर्च | ९७५४२ | ९७९५३ | ९७५११ |
| | **एकूण** | **४९,७४,६५२** | **४९,९५,६१६** | **४९,७३,०६१** |

**एकूण रु. १,४९,४३,३२९/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणपन्नास लक्ष त्रेचाळीस हजार तीनशे एकोणतीस फक्त)**

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.16 18:14:00 +05'30'

(प्र. नि. पाटील)
कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव
महाराष्ट्र शासन